D:\HDO-Ixr318

**लेखा अनुदान २००१-२००२**
मागणी क्रमांक बी-११, मुख्यलेखाशीर्ष
२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण,
१०४-ठेव संलग्न विमा योजना.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक:एमआयएस-०१००/१९०१/सीआर-३०६/आस्था-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :८ ऑक्टोबर, २००१.

**वाचा :-** शासन ज्ञापन क्रमांक:एमआयएस-०१००/१९०१/सीआर-३०६/आस्था-१, दिनांक ४ जून, २००१

**शासन निर्णय :-** वित्तीय वर्ष २००१-२००२ करिता मागणी क्रमांक बी-११, मुख्यलेखाशीर्ष "२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०४-ठेव संलग्न विमा योजना" अंतर्गत या विभागास रु.१,२०,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी वीस लक्ष फक्त) एवढा निधी प्राप्त झालेला असून वर नमूद केलेल्या दि.४.६.२००१ च्या शासन ज्ञापनान्वये खुद्द गृह विभाग व क्षेत्रीय कार्यालय प्रमुखांना त्यांचे प्रारुप मागणी नुसार चिन्हांकित करण्यात आलेला आहे.

२. शासन आता असे निदेश देत आहे की, शासन निर्णय (वित्त विभाग) क्रमांक:पीईएन-१७७६/सीआर-१२३०-७६/सेवा-८, दिनांक २४.१.७७ त्याचप्रमाणे महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियमावली मधील संबंधित तरतुदी विचारात घेता ठेव संलग्न विमा योजना अंतर्गत मंजूरीचे अधिकार हे क्षेत्रीय कार्यालय प्रमुखांना प्रदत्त असल्याने या प्रयोजनाकरिता वर नमूद केलेल्या दिनांक ४ जून, २००१ अन्वये चिन्हांकित करण्यात आलेली तरतूद ही उपलब्धही असल्याचे कृपया समजण्यात यावे. त्यानुषंगाने निधी उपलब्ध असल्याचे प्रमाणीत करण्यात येत आहे. निधी उपलब्धता प्रमाणपत्राची वैधता दिनांक ३१.३.२००२ पावेतो राहील. त्यानुसार आपले आस्थापनेवरील मृत अधिकारी / कर्मचारी यांचे वारसदारांना वरील योजनेअंतर्गत अतिरिक्त अनुदान मंजूर करण्याची प्रकरणे कृपया त्वरीत निकाली काढावीत. ही प्रकरणे मंजूर करतांना शासन निर्णय (वित्त विभाग) क्रमांक पीईएन-१७७५/१४४/७५/एस-२, दिनांक ३१.३.७५, शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:पीईएन-१७७६/सीआर-१२३०-७६/सेवा-८, दिनांक २४.१.७७, शासन निर्णय (सा.प्र.वि.) क्रमांक:भनिनि-१०८९/प्र.क्र.६०/९०/१३-अ, दिनांक १२.९.९० व महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियमावली तसेच शासनाने वेळोवेळी सुधारीत केलेल्या शासन आदेशातील तरतूदी विचारात घेऊन परिपूर्ण प्रस्तावांनाच मंजूरी देण्यात यावी. याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखांची असेल. लाभार्थीला अनुदानाची रक्कम मिळण्यास अकारण दिरंगाई होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

GR-20020122150211000-0200

३.  शासन असेही निदेश देत आहे की, ज्या क्षेत्रीय कार्यालयांनी दिनांक ४ जून, २००१ चे ज्ञापनास अनुसरुन "निधी उपलब्धता" प्रमाणपत्र प्राप्त करण्यासाठी शासनास प्रस्ताव सादर केले आहेत व शासनाने तशा अर्थाचे प्रमाणपत्र दिले आहे त्यांनी त्या प्रमाणपत्रानुसार प्रकरणे निकाली काढावीत. मात्र त्यानंतरही शिल्लक राहिलेल्या रकमेसाठी शासनास आता प्रस्ताव पाठविण्याची आवश्यकता नाही त्यांनी प्रतिक्षा यादीनुसार शिल्लक रकमेतील प्रकरणे नियमानुसार तपासून मंजूर करावीत. ज्या कार्यालयांनी निधी उपलब्धतेकरिता अद्यापी प्रस्ताव शासनास सादर केलेले नाहीत त्यांनी आता शासनास प्रस्ताव न पाठविता आपले स्तरावर संबंधित नियमातील तरतुदींच्या अधिन राहून प्रकरणे मंजूर करावीत. असे करतांना कुठल्याही परिस्थितीत चिन्हांकित निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी, अन्यथा नियंत्रण अधिकाऱ्यांना जबाबदार धरण्यात येईल.

४.  वरील कार्यवाही करतांना संदर्भात नमूद केलेल्या दिनांक ४ जून, २००१ चे ज्ञापनात नमूद केलेल्या इतर अटींचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घ्यावी. तसेच मंजूर केलेल्या अग्रीमाच्या आदेशाची प्रत, प्राधिकृत देय रकमेचे पत्र तसेच प्रमाणक क्रमांक, दिनांक व कोषागाराचे नाव इत्यादी माहिती शासनास तात्काळ सादर करावी. आपणास चिन्हांकित व आता उपलब्धही करुन दिलेल्या अनुदानाच्या खर्चाचा व शिल्लक रकमेचा प्रमाणीत तपशील दर दोन महिन्यांनी शासनास सादर करण्यात यावा. वित्तीय वर्ष २००१-२००२ मध्ये मार्च २००२ पावेतो जेवढा निधी खर्च होईल तेवढाच निधी राखून ठेवावा व आवश्यकता नसलेला निधी आठमाहि सुधारित अंदाजामध्ये <u>दिनांक १५ नोव्हेंबर, २००१ पर्यंत</u> अथवा गरज नसल्यास तात्काळ शासनास परत करावा याची कृपया नोंद घ्यावी.

५.  असेही निदेश देण्यात येत आहे की, चिन्हांकित व आता उपलब्धही करुन दिलेल्या रकमेचा खर्च ताळमेळ महालेखापाल यांचे कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका प्रकरण १४ तसेच नियम १५७ मधील परिशिष्ट ३ तसेच शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार योग्य प्रकारे व योग्य वेळी करुन त्याबाबतची प्रमाणीत माहिती शासनास विहित मुदतीत पाठविण्यात यावी त्याचप्रमाणे उपलब्ध करुन दिलेल्या निधीपेक्षा अधिक खर्च न करण्याची दक्षता घ्यावी. अधिक खर्चाच्या बाबतीत कोणत्याही स्पष्टीकरणाचा विचार करण्यात येणार नाही व त्यासाठी <u>नियंत्रण अधिकाऱ्यास व्यक्तिशः जबाबदार</u> धरण्यात येईल. खर्च मेळाची माहिती महालेखापाल यांचे कार्यालयाकडून प्रमाणीत करुन पाठविण्याची संपूर्ण जबाबदारी <u>ही क्षेत्रीय विभाग / कार्यालय प्रमुख</u> म्हणून आपली राहिल व त्याप्रमाणे प्रमाणित माहिती न पाठविणाऱ्या कार्यालयातील संबधितांवर जबाबदारी निश्चित करुन कारवाई करण्यात येईल. प्रमाणित न केलेली माहिती शासनामार्फत स्विकारण्यात येणार नाही व त्यामुळे विलंब झाल्यास संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय विभाग / कार्यालय प्रमुखाची राहिल.

६.  वरील आदेशांचे काटेकोर पालन करुन मुख्यलेखाशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०४-ठेव संलग्न विमा योजना अंतर्गत अतिरिक्त अनुदान मंजूर करण्याची प्रकरणे संबंधित

GR - 200201221502111000 - 0201

नियमांच्या अधिन राहून, तसेच चिन्हांकित व आता उपलब्ध करुन दिल्याप्रमाणे निधीच्या मर्यादेत मंजूर करावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( रि.इ.शेख )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

स्वीय सहायक, अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
स्वीय सहायक, प्रधान सचिव (अपील व सुरक्षा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
सह सचिव, कार्यासन पोल-१ (शापोरो), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महासमादेशक, होमगार्डस्, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, सरकारी अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

प्रत, माहिती व योग्य त्या कार्यवाहीसाठी सादर अग्रेषित :-
महालेखापाल-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
अवर सचिव, कार्यासन बियुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (रोख शाखा), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन बियुडी-२/३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती आस्थापना-१.

GR 200201921502110009-0200